# कुठे बांधायचं घर

मार्जान केशवर्झी आझाद
भाषांतर : शरद महाबळ
चित्रकार : मोहम्मद महल्लटी



ज्योत्स्ना प्रकाशन

# कुठे बांधायचं घर

मूळ लेखक : मार्जान केशवर्झी आझाद
मराठी भाषांतर : शरद महाबळ
चित्रकार : मोहम्मद (परवीझ) महल्लटी



ज्योत्स्ना प्रकाशन

JYOTSNA PRAKASHAN



Originally published as: Khaneye Ma Koja Ast
Author: Marjan Keshavarzi Azad
Translator: M. A. Ghahremani Ghajar



मराठी आवृत्ती : कुठे आहे आपलं घर

प्रकाशक : मिलिंद ल. परांजपे, ज्योत्स्ना प्रकाशन

'धवलगिरी', ४३०-३१ शनिवार पेठ, पुणे ४११०३०

मुंबई ऑफिस : मोहन बिल्डिंग, १६२ ज.शंकरशेठ मार्ग, गिरगाव, मुंबई ४००००४

 पहिली आवृत्ती : सप्टेंबर २००७

मुद्रक : रिच प्रिंटस्, २७२ नारायण पेठ, पुणे ४११०३०

मूल्य रुपये २०/-    ISBN 81-7925-172-0

सकाळ झाली. कोंबडेदादा आणि कोंबडेबाई दोघांनी घरातलं सगळं सामान आवरलं. आता त्यांनी एखाद्या निसर्गरम्य ठिकाणी नवीन घर बांधायचं ठरवलं होतं, छान आणि प्रशस्त! नवीन घर कुठे बांधायचं ते मात्र त्यांनी अजून नक्की केलं नव्हतं.

कोंबडेदादा नेहमी म्हणत, 'आपलं हे कुरण अगदीच छोटं आहे, कशाला राहावं आपण इथे? जग किती मोठं आणि सुंदर आहे. थोडंसं फिरलो तर घरासाठी नक्की एखादी छानशी जागा सापडेल.'

कोंबडेबाईंनाही ते पटत होतंच. त्यात आता त्यांना वाटत होतं, आपली पिलं नव्या घरी जन्माला यावीत! कोंबडेदादांनी आपलं सामान उचललं, कोंबडेबाईंनी आपली अंडी एका छोट्याशा टोपलीत अलगद ठेवली नि दोघंही तयार झाले.





ते निघाल्यावर शेळी, तपकिरी मांजर आणि बदक या त्यांच्या शेजाऱ्यांना फार वाईट वाटलं. त्यांचा निरोप घेताना कोंबडेबाईंना बराच वेळ लागत होता. शेवटी कोंबडेदादांनी आपले पंख फडफडवले आणि डोक्यावरचा तुरा उंचावत ते ओरडले,

'अहो बाई, आटपा आता लवकर, उशीर होतोय! अंधार पडायच्या आत आपल्याला नवीन घराची सोय करायची आहे.'

कोंबडेबाईंनी आपले डोळे पुसले. बदकबाईंचा निरोप घेतला नि अंड्यांची टोपली उचलली.

दोघंही नव्या घराच्या शोधात बाहेर पडले!

चालतचालत ते एका हिरव्यागार जंगलापाशी पोचले. कोंबडेबाईंनी यापूर्वी इतकी झाडं कधीच पाहिली नव्हती. आनंदाने त्या म्हणाल्या, 'किती छान वाटतंय इथे! या झाडांच्या थंड सावलीत आपली पिलं खेळतील, इकडेतिकडे बागडतील. आपल्याला इथे घर बनवता येईल का हो?'





कोंबडेदादा म्हणाले, 'तुला पसंत असेल तर इथेच घर बांधू.'

ते एवढं म्हणताहेत तोच धपधप असा दमदार पावलांचा आवाज आला नि जमीन थरथरू लागली. कोंबडेबाईंनी आपली टोपली एका झाडामागे ओढली आणि दोघं लपून बसले. एक अगडबंब हत्ती तिथून झपाट्यानं चालत जात होता.

कोंबडेबाई म्हणाल्या, 'चला, चला लवकर इथून. अशा मोठ्या जनावरांच्या पायाखाली माझी पिलं तुडवली जातील! मला नाही राहायचं इथे!'



लगेच कोंबडेदादांनी सगळं सामान उचललं आणि दोघं पुन्हा चालू लागली. चालत चालत ते अशा ठिकाणी पोचले की, जिथे झाडांचा मागमूस नव्हता. त्यांच्या अंगावर थंडगार झुळूक येत होती आणि पावलांना मऊमऊ वाळू गुदगुल्या करत होती. ते समुद्रकिनारी पोचले होते. कोंबडेबाईंनी पूर्वी कधी समुद्र पाहिला नव्हता. त्या खुशीत येऊन म्हणाल्या, 'वा! केवढी सुरेख आहे ही जागा! निळंशार पाणी नि उबदार मऊ वाळू, इथे माझी पिलं आनंदानं खेळतील.'

कोंबडेदादांनी अभिमानानं आपला लाललाल तुरा हालवला आणि म्हटलं, 'तुला हवं असेल, तर आपण इथेच घर बांधू.'



असं म्हणत त्यांनी सामान खाली ठेवलं मात्र, इतक्यात एक मोठी लाट येऊन किनाऱ्यावर आदळली. कोंबडेदादांची रंगीत पिसं चिंब भिजली. लागलीच कोंबडेबाईंनी अंड्यांची टोपली उचलली, आणि म्हणाल्या, 'नको, चला इथून. या पाण्यात आपली पिलं वाहून जातील एखादवेळी. मला नाही इथं राहायचं.'

कोंबडेदादा पार भिजून गेले होते. त्यांनी पंख झटकले, सामान उचललं आणि म्हणाले, 'काळजी करू नको आणि असा धीर सोडू नकोस. पृथ्वी खूप मोठी आणि सुंदर आहे. सर्वांत सुंदर आणि सुरक्षित अशा एखाद्या ठिकाणी आपण घर बांधू, जिथे आपली पिलं आनंदानं आणि सुखानं राहतील.'

मग पुन्हा त्यांचा प्रवास सुरू झाला. कोंबडेबाई आता फार कंटाळल्या होत्या आणि थोड्या निराशही झाल्या होत्या. त्यांच्या छोट्या सुंदर डोळ्यांत अश्रू पाहून कोंबडेदादा थांबले नि म्हणाले, 'घाबरू नको, काळजी करू नको. मी तुला आता एका पर्वतावर घेऊन जातो. आपण तिथे घर बांधू.'

मग पुन्हा ती दोघं चालू लागली. एका उंच पर्वतावर पोहोचेपर्यंत ती चालत होती. त्या पर्वतावर चढताना कधी कधी पायाखालून छोटेछोटे दगड-गोटे घरंगळत पायथ्यापर्यंत जात होते.

कोंबडेदादा म्हणाले, 'आलो आपण पर्वतावर, कशी वाटते तुला ही जागा?'





कोंबडेबाई म्हणाल्या, 'इथे सगळीकडे दगड-गोटे पसरले आहेत. आपण पर्वतावर घर बांधलं तर एखादं इवलंसं पिलू एवढ्या उंचावरून खाली पडायची भीती आहे. आणि जर पायथ्याशी घर बांधलं तर वरून गडगडत येणारे दगड आपल्या पिलांवर पडतील. तशी ही जागा सुंदर आहे, पण...'

कोंबडेदादा म्हणाले, 'आलं लक्षात. तुला काही ही जागा पसंत नाही.'

पुन्हा एकदा त्यांची वाटचाल सुरू झाली. ते पर्वताच्या दुसऱ्या बाजूने खाली उतरले नि चालत राहिले. आता ते पार थकून गेले होते. समोर एक कोरडं ठणठणीत सपाट असं मैदान पसरलं होतं. इथे झाडेही नव्हती, पाणीही नव्हतं आणि खडकही नव्हते. संध्याकाळच्या सूर्यकिरणात पसरलेले गोटे छान सोनेरी दिसत असले तरी ते चांगलेच तापलेले होते.

कोंबडेबाई म्हणाल्या, 'ही जागाही छान आहे; पण, माझ्या पिलांना इथला उकाडा सहन होणार नाही.' आता त्या कंटाळल्या होत्या, थकून गेल्या होत्या. त्यांना हुंदका आवरेना, त्या रडू लागल्या.

कोंबडेदादांना सर्व काही सहन करता येत असे; पण कोंबडेबाईंचे अश्रू सहन होत नसत. त्या कायम सुखी, आनंदी राहाव्यात असं त्यांना



वाटत असे. आणि कोंबडेबाईंना हमखास खुश करणारी एक गोष्ट त्यांना माहीत होती. ती म्हणजे त्यांचं खणखणीत आवाजातलं आरवणं. त्यांनी सूर्याकडे पाहिलं. जवळजवळ सूर्य मावळण्याची वेळ झाली होती. खरं म्हणजे कोणताही कोंबडा यावेळी आरवला नसता, पण काही झालं तरी त्यांना कोंबडेबाईंना खुश करायचं होतं.

सर्व सामान तिथेच वाळवंटात ठेवून त्यांनी जवळच्या एका छोट्याशा सोनेरी टेकडीवर उडी मारली. डोळे मिटून त्यांनी 'कुकूऽऽऽच कूऽऽ' असं आरवायला सुरुवात केली. तो आवाज भोवतालच्या सगळ्या वाळवंटात पसरला. कोंबडेबाईंनी डोळे पुसले. आपल्या पाणावलेल्या डोळ्यांनी कोंबडेदादांकडे पाहत त्या हळूच हसल्या.



आता कोंबडेबाईंना त्यांची कोंबडेदादांशी झालेली पहिली भेट आठवली. कोंबडेदादा शेतातल्या छोट्या गंजीवर आपला लाल लाल तुरा घेऊन कसे ऐटीत उभे होते. आणि त्यांचा आरवण्याचा आवाज भोवतालच्या सात शेतांमध्ये पसरला होता. त्यांना त्यांच्या लग्नाचा दिवसही आठवला, शेजाऱ्यांची माया आठवली.

धीर एकवटून त्यांनी म्हटलं, 'अहो, मी सांगू का आपलं घर कुठे असावं ते!'

कोंबडेदादांनी डोळे उघडले, कोंबडेबाईंचा हसरा चेहरा पाहून त्यांनी उत्सुकतेनं विचारलं, 'कुठे?'

कोंबडेबाई म्हणाल्या, 'आपल्या शेतावर. पृथ्वीवरील सर्वांत सुंदर जागा तीच आहे.'

कोंबडेबाई व कोंबडेदादांनी आपलं सामान उचललं, अंडी ठेवलेली टोपली घेतली आणि सरळ आपल्या शेताची वाट धरली.

आणि खरोखरच त्यांना पृथ्वीवरील सर्वांत सुंदर जागी असलेलं आपलं घर अंधार पडण्याआधी सापडलं होतं.



